पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालयाच्या अधिपत्याखालील संग्रहालयांच्या कामांना वित्तीय मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक : संग्रह-२०२५/प्र.क्र.६६/सां.का.३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २७ मे, २०२५

**वाचा :-** १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. संग्रह-२०२५/प्र.क्र.२४/सां.का.३, दि.१३.०३.२०२५.
२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. संग्रह-२०२५/प्र.क्र.२३/सां.का.३, दि.१३.०३.२०२५.
३) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. संग्रह-२०२५/प्र.क्र.५७/सां.का.३, दि.२७.०३.२०२५.
४) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. संग्रह-२०२४/प्र.क्र.११/सां.का.३, दि.११.०३.२०२५.
५) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, समक्रमांक शासन निर्णय, दि.३१,०३,२०२५

**प्रस्तावना :-**

पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांच्या अधिपत्याखालील संग्रहालयांतील विविध कामांना उपर्निर्दिष्ट क्र.१ ते ५ येथील शासन निर्णयांन्वये प्रशासकीय मान्यता/सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार वेळोवेळी सदर कामांना निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. आता, श्री भवानी चित्रसंग्रहालय व ग्रंथालय औंध, सातारा व थिबा पॅलेस संग्रहालय, रत्नागिरी या संग्रहालयातील कामांकरीता एकूण रु.४,६२,४०,६५२/- इतक्या रकमेच्या देयकांना वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांच्या अधिपत्याखालील संग्रहालयांतील खालील नमूद कामांसाठी येणाऱ्या एकूण रु.४,६२,४०,६५२/- (अक्षरी रुपये चार कोटी बासष्ठ लक्ष चाळीस हजार सहाशे बावण्ण मात्र) इतक्या रकमेच्या देयकांना या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | संग्रहालयाचे नाव | कामाचा तपशिल | रक्कम |
|---|---|---|---|
| १ | श्री भवानी चित्रसंग्रहालय व ग्रंथालय, औंध, जि.सातारा | संग्रहालयाच्या उपहारगृहात फरशी | ₹९,९६,१५६ |
| २ | | रंगकाम करणे | ₹२,४८,४१३ |
| ३ | थिबा पॅलेस संग्रहालय, रत्नागिरी | संग्रहालयातील कलावस्तु अंतर्गत मांडणी व नवीन दालन निर्मिती करणे | ₹४,४९,९६,०८३ |
| | **एकूण मागणी** | | **₹४,६२,४०,६५२** |

२. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय विअप्र-२०१३/प्र.क्र.२०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४ मधील परिच्छेद क्र. २७(२) "अ" नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णयास वित्त विभाग अनौ.सं.क्र.३२२/व्यय-१५, दि.०८ मे, २०२५ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

४. यासाठी होणारा खर्च पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. झेडडी-२, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, (०१) (०२) विविध वस्तू संग्रहालयातील विशिष्ट विभागाची पुनर्रचना व विकास (राज्य) (कार्यक्रम) (२२०५ १३२९) २७-लहान बांधकामे या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२५/ प्र.क्र.४४/ अर्थ-३, दि.०७ एप्रिल, २०२५ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांची राहील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०५२७१३१४५६६८२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PARSRAM NANDRAM BAHURE

Digitally signed by PARSRAM NANDRAM BAHURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=ef62741544bc4d8832eecfb2b7ea295e8a6fcdfe9faffcfda201c87e1c73881b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5FD2A6873F4AE5B1D9EA7DD52E449E02A942EA90145BAEAB72C63CED6D659844, cn=PARSRAM NANDRAM BAHURE
Date: 2025.05.27 13:16:18 +05'30'

**( परसराम न. बहुरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. उपसचिव (सां.का.३), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. अभिरक्षक, (रत्नागिरी, सातारा)
६. महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८. महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. महालेखापाल -२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, (रत्नागिरी, सातारा)
११. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती, सां.का.३.